राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त यांच्या कार्यालयात कार्यरत श्रीमती श्वेता स.सावंत, लिपिक-टंकलेखक यांच्या प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि-२५१८/प्र.क्र.१००/१४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०४ जुलै, २०१८

वाचा : १) सामान्य प्रशासन विभाग आदेश क्र.कअनि-१११७/प्र.क्र.३६/१४-ब, दिनांक २ मे, २०१७
२) राज्य सेवा हक्क आयोग, मुंबई याचे पत्र दिनांक -- फेब्रुवारी, २०१८

**शासन आदेश**

श्रीमती श्वेता स.सावंत, लिपिक-टंकलेखक, सामान्य प्रशासन विभाग यांची संदर्भाधिन क्र.१ वरील दिनांक २.५.२०१७ च्या आदेशान्वये ६ महिन्यांच्या कालावधीकरिता राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त यांचे कार्यालय, निर्मल भवन, २ रा मजला, नरिमन पॉईंट, मुंबई या कार्यालयात लिपिक-टंकलेखक पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली होती.

२. श्रीमती सावंत या राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई येथे दिनांक ०५-०५-२०१७ रोजी रुजु झाल्या त्यांचा ६ महिन्याचा प्रतिनियुक्तीचा कालावधी दिनांक ०४-११-२०१७ रोजी संपुष्टात आला आहे.

३. राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, मुंबई यांनी त्यांच्या संदर्भाधिन क्र.२ येथील दिनांक -- फेब्रुवारी, २०१८ च्या पत्रान्वये श्रीमती सावंत यांच्या प्रतिनियुक्तीस २ वर्ष मुदतवाढ देण्याची विनंती केली होती.

४. महाराष्ट्र लाकेसेवा हक्क अधिनियम, २०१५ या कायद्याच्या अंमलबजावणीची आवश्यकता लक्षात घेता सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही २०११/प्र.क्र.१३७/का.१२, दिनांक १७.१२.२०१६ अन्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत करावयाची कार्यपध्दती सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१७/प्र.क्र.१२०/१४, दिनांक ३१.८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आली आहे. या शासन निर्णयातील तरतूदीनुसार श्रीमती सावंत यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीस दिनांक ०५-११-२०१७ पासून पुढील दोन वर्षाच्या कालावधीसाठी (दिनांक ०४-११-२०१९ पर्यंत)खालील अटींच्या अधीन राहून प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देण्यात येत आहे.

(अ) ज्या तारखेला प्रथम ६ महिन्याचा प्रतिनियुक्तीचा कालावधी संपुष्टात आला त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या मुदतवाढीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला संबंधित कर्मचारी आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्वीकारील त्या तारखेला समाप्त होईल.

(ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्याला परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/संवर्ग नियंत्रण अधिकारी/सक्षम प्राधिकारी राखून ठेवील

(क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्याला मूळ विभागाकडे परत पाठवण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठवण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

(ड) त्याने मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्याला मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

५. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत संबंधित कर्मचाऱ्यांना प्रतिनियुक्ती भत्ता देय असणार नाही. म.ना.से.(नदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा...इ) नियम १९८ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन व सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय दिनांक १७-१२-२०१६ मधील तरतुदी विचारात घेऊन सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १९ व सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १८ यांनी आपापसात सल्लामसलत करुन ठरवाव्यात.

६. श्रीमती सावंत या सामान्य प्रशासन विभाग यांच्या आस्थापनेवर कार्यरत होत्या, सामान्य प्रशासन विभाग हे त्यांचे प्रशासकीय विभाग असल्यामुळे त्यांच्या प्रशासकीय बाबी संबंधित कर्मचाऱ्याचे प्रशासकीय विभाग व सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १८ यांचेमार्फत हाताळण्यात येतील.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७०४१७१७१६४६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2018.07.04 17:18:21 +05'30'

**( इ.मु.काझी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित कर्मचारी (राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालयामार्फत)

**प्रत,**

१. अ.मु.स (र. व का.)/अ.मु.स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त यांचे कार्यालय, निर्मल इमारत, २ रा मजला, नरिमन पॉईंट, मुंबई-४०००२१

३. सह/उप सचिव (आस्थापना), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
त्यांना विनंती करण्यात येते की, सदर कर्मचाऱ्यांच्या सेवा प्रतिनियुक्तीने राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त यांच्या मुख्यालयात उपलब्ध करुन देताना त्या संबंधिच्या अटी व शर्ती संदर्भात शासन आदेश क्र.कअनि-१११७/प्र.क्र.३६/१४-ब, दिनांक ०२-०५-२०१७ मध्ये प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्तीबाबत उल्लेख केलेला नसल्यामुळे आता मुदतवाढीच्या आदेशात प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्तीचा उल्लेख करावा त्यासाठी त्यांनी सा.प्र.वि./का.१८ यांच्याशी संपर्क करावा व प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती ठरविल्यानंतर म.ना.से. (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा..इ.) नियम, १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन) मध्ये नमूद केलेल्या अटी

व शर्ती नमूद करुनच प्रतिनियुक्तीस मुदतवाढीबाबतचे आदेश निर्गमित करावेत. त्यानुसार काढलेल्या आदेशाची प्रत या कार्यासनाकडे तत्काळ पाठविण्यात यावी.

४. उप सचिव (का.क्र.१८), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

त्यांना विनंती करण्यात येते की, सदर कर्मचाऱ्याची सेवा प्रथम ६ महिन्याच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देण्यात आली होती व त्यास आता पुढील दोन वर्षाच्या कालावधीसाठी (दिनांक ०४-११-२०१९ पर्यंत) मदुतवाढ देण्यात आली आहे. त्यांनी मुदतवाढीच्या अटी व शर्ती संदर्भात सा.प्र.वि/कार्यासन १९ यांना सहाकार्य करावे.

५. साप्रवि/१४-अ (संग्रहार्थ).